**महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठाकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित निधीपैकी बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कौविवि-२०२४/प्र.क्र.५१/उद्योजकता**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०३ जुलै, २०२४.

**वाचा :** १) प्र. कुलसचिव, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ यांचे पत्र क्र.म.रा.कौ.वि./लेखा/निधी/२०२४-२५/२२३, दि.३१.०५.२०२४.
२) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र.कौविउ-२०२०/प्र.क्र.१३/उद्योजकता, दि.३०.०५.२०२२.
३) वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४.

**प्रस्तावना:**

राज्यातील युवक/युवतींना कौशल्याधारित रोजगारक्षम शिक्षण देण्यासाठी अर्थसहाय्यित तत्वावर सार्वजनिक कौशल्य विद्यापीठाची स्थापना, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ अधिनियम, २०२१ (सन २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ७ ) दिनांक २३ मार्च, २०२१ अन्वये करण्यात आली असून दि.६ एप्रिल, २०२१ रोजीच्या अधिसूचनेनुसार सदर अधिनियम दिनांक १४ एप्रिल, २०२१ पासून अंमलात आला आहे.

महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठाचे कामकाज सुरु करुन विद्यार्थ्यांना दर्जेदार कौशल्य शिक्षण देण्याचा शासनाचा मानस आहे. कौशल्य विद्यापीठाचे कामकाज सुरु व्हावे या हेतूने विद्यापीठाच्या उभारणीकामी आवश्यक त्या बाबींसाठी निधीची आवश्यकता आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठाकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित रु.५१.०७ कोटी इतक्या तरतूदीपैकी बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध असलेला रु.१,९९,००,०००/- (रुपये एक कोटी, नव्व्यान्नव लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त मंजूर निधी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठास प्रदान करण्यासाठी दि.३०.०५.२०२२ च्या शासन निर्णयान्वये आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य विकास,

रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तसेच सह/उप सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे. सदर रक्कम एकरक्कमी पध्दतीने विद्यापीठास अदा करण्यात यावी.

३. सदर वितरीत निधीच्या अनुषंगाने होणारा खर्च "झेड ए-०२, २२५१, सचिवालय सामाजिक सेवा, (०१)(०५) कौशल्य विकास विद्यापीठ कार्यक्रम (२२५११०७६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. विद्यापीठास उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी विद्यापीठाच्या उभारणीकामी खर्च करुन त्यासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विद्यापीठाने शासनास सादर करावे.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारी संदर्भ क्र.२५९/१४७१, दि.०१.०७.२०२४ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१७३/व्यय-६, दि.०३.०७.२०२४ आणि संदर्भ क्र.३ येथे नमूद वित्त विभागाच्या दि.०१ एप्रिल, २०२४ च्या परिपत्रकान्वये विभागांना दिलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०७०३१६०३५८०२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANJUSHA
AMIT KARANDE

Digitally signed by MANJUSHA AMIT KARANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT,
2.5.4.20=4b1c1c68b2fb7d60932c7a539658f299af288eb5fbe81ceb2178b5deea6f7a28, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6BC8432DE7E7323854E5E7499C63951988287A093EF9B088F4B029753EA90109, cn=MANJUSHA AMIT KARANDE
Date: 2024.07.03 18:40:10 +05'30'

**( मंजुषा कारंडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे मार्फत)

**प्रत,**
१. सचिव (कौ.रो. उ.व ना. विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. कुलसचिव, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, एलफिन्स्टन तांत्रिक विद्यालय परिसर, महापालिका मार्ग, मुंबई-०१.

३. उप सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,मंत्रालय, मुंबई.

४. आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. वित्त व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, एलफिन्स्टन तांत्रिक विद्यालय परिसर, महापालिका मार्ग, मुंबई-०१.

६. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

७. निवासी लेखाधिकारी, मुंबई.

८.कार्यासन प्रशासन-३, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,मंत्रालय, मुंबई.

९. निवड नस्ती (उद्योजकता)